डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी वास्तव्य केलेले लंडनस्थित घर खरेदीकरण्यासाठी रु. ३५,९५,६७,०००/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक - पुरवणी-२०१५/प्र.क्र. ५२/विघयो (३),**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ०६ नोव्हेंबर, २०१५

वाचा:- १) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
क्र. विघयो- २०१४/प्र.क्र.८०/विघयो, दिनांक १६ फेब्रुवारी, २०१५

२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
क्र. विघयो- २०१५/प्र.क्र.३०/विघयो, दिनांक १८ फेब्रुवारी, २०१५

३) ज्ञापन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
क्र. पुरवणी-२०१५/प्र.क्र. ५२/विघयो, दिनांक १६ संप्टेबर, २०१५

४) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
क्र. पुरवणी-२०१५/प्र.क्र. ५२/विघयो (१), दिनांक ०६ नोव्हेंबर, २०१५

५) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
क्र. पुरवणी-२०१५/प्र.क्र. ५२/विघयो (२), दिनांक ०६ नोव्हेंबर, २०१५

**प्रस्तावना**

आपल्या देशाला थोर व्यक्तिमत्वांची परंपरा असून भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर हे यापैकी एक अलौकिक व्यक्तिमत्व आहे. भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी या देशातील दलित, पद-दलित यांच्या हक्कांसाठी जीवनभर संघर्ष केला आहे. तसेच ते भारतीय राज्यघटनेचे शिल्पकार आहेत. डॉ.बाबासाहेब आंबेडकरांनी देशातील तसेच परदेशातील अतिउच्च पदव्या संपादित केलेल्या होत्या. डॉ.बाबासाहेब आंबेडकर हे या देशाचे युगपुरुष असून त्यांची ओळख या देशाचे महामानव म्हणून जगभरात आहे.

सन १९२१-२२ या कालावधीत डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांचे लंडन येथे १०, किंग्ज हेन्री रोड, एन.डब्ल्यू.३, येथे वास्तव्य होते. या कालावधीत त्यांनी लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स मधून डी.एस.सी.इन इकॉनॉमिक्स आणि ग्रेझ इन या संस्थेमधून बार ॲट लॉ या पदव्या संपादित केल्या. अशा या युगपुरुषाच्या वास्तव्याच्या आठवणी या घराशी जुळलेल्या आहेत. ही वास्तु या देशासाठी ऐतिहासिकदृष्टया महत्वाची आहे. या वास्तुसमोर "ब्ल्यु प्लंक" म्हणजेच मान्यताप्राप्त बोर्ड लावण्यात आला असून त्यावर "Dr. Bhimrao Ramji Ambedkar (1891-1956) Indian Crusader for Social Justice lived here during 1921-22" असे सन्मानपूर्वक लिहिले आहे. सदर वास्तु खुल्या लिलावाद्वारे विक्री करण्याची जाहिरात या वास्तुच्या मालकाने दि.१ सप्टेंबर, २०१४ रोजी प्रसिध्द केली आहे. या वास्तुचे ऐतिहासिक महत्व लक्षात घेता सदरहू वास्तु ऐतिहासिक स्मारक म्हणून जतन करण्यासाठी शासनामार्फत खरेदी करण्यास मा. मंत्रीमंडळाच्या दि. ०३.०२.२०१५ रोजीच्या बैठकीत तत्वत: मान्यता देण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती. त्यास अनुसरुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय:-**

डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी सन १९२१-२२ मध्ये वास्तव्य केलेले लंडनस्थित १० किंग्ज हेन्री रोड, एन.डब्ल्यू.३ लंडन येथील घर राज्य शासनाने खरेदी करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करण्यासाठी संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णय दि. १६.२.२०१५ अन्वये मा.मंत्री (सामाजिक न्याय) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली आहे. तसेच दि. ०३.०२.२०१५ रोजीच्या पत्रान्वये या कामासाठी मे. सेडॉन यांची सॉलिसिटर म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

२. या प्रकरणी शासनाच्या वतीने नेमणूक केलेल्या २ सर्व्हेअर/ व्हॅल्युअर यांचे अहवाल व घरमालकाने दर्शविलेली किंमत विचारात घेऊन घराची खरेदी किंमत ३.१ मिलियन GBP निश्चित करण्यात आली. सदर घराची किंमत ३.१ मिलिअन पौंड (रु. ३१.०० कोटी) तसेच स्टॅम्प डयुटी, मे.सेडॉन, सॉलिसिटर यांची फी, कायदेशीर खर्च, विनिमय दराच्या फरकाची रक्कम, इतर अनुषंगिक खर्च इत्यादीसह रु. ३५,९५,६७,०००/- (रुपये पस्तीस कोटी पंच्याण्णव लाख सदुसष्ट हजार फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र शासनाने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी वास्तव्य केलेले लंडन स्थित घर खरेदी विषयक आवश्यक कार्यवाही पूर्ण करुन घर खरेदीची कार्यवाही सप्टेंबर, २०१५ अखेर पूर्ण करण्यात आली आहे. सदरहू घर महाराष्ट्र शासनाच्या मालकीचे झाले आहे.

४. सदर घर ही परदेशी वास्तु असल्यामुळे या घराच्या खरेदीची प्रक्रिया तेथील भारतीय उच्चायुक्तांमार्फत करणे आवश्यक आहे. त्यानुसार डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांनी सन १९२१-२२ मध्ये वास्तव्य केलेल्या लंडनस्थित १० किंग्ज हेन्री रोड, एन. डब्ल्यू. ३ लंडन येथील घरासंबंधी करार, कागदपत्रांवर स्वाक्षरी करणे आणि मालमत्तेवर देखरेख करणे यासाठी इंग्लंडमधील भारतीय उच्चायुक्त यांना महाराष्ट्र शासनामार्फत प्राधिकृत करण्यात आले आहे.

५. सदर खर्च पुढील लेखाशीर्षा खालील सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी मंजूर तरतूदीमधून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मागणी क्र. एन ४,**
**मुख्य लेखाशिर्ष ४२२५**
**अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांच्या कल्याणावरील भांडवली खर्च**
**०१, अनुसूचित जातींचे कल्याण**
**७८९, अनुसूचित जाती उपयोजना**
**(००) (०१) डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी १९२१-२२ दरम्यान लंडन येथे वास्तव्य केलेल्या घराची खरेदी करणे.**
**(४२२५ ११६३) (योजनांतर्गत) (दत्तमत)**
**५३, मोठी बांधकामे**

६. सदर रक्कम वितरीत करण्याकरीता आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच नियंत्रक अधिकारी तथा सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना या देयकाकरीता नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५९७/व्यय-१५, दि. २४.०८.२०१५ व क्र. ६१८/व्यय-१५, दि. २१.०८.२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५१११६१५२८३१५६२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400051, st=Maharashtra, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2015.12.01 11:40:09 +05'30'

**( दि.रा. डिंगळे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) नियंत्रक अधिकारी तथा सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११) आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) सह सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) कक्ष अधिकारी (अर्थ-७/व्यय-१५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती (विघयो)